**सेवार्थ प्रणालीत वेतन**
**देयके काढण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण १००७/प्र.क्र.११२/कोषा प्रशा -५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मे, २०१०

**परिपत्रक**

मासिक वेतनाची देयके तयार करण्याकरीता सेवार्थ प्रणालीत सर्वच आहरण व संवितरण अधिकारी महिन्याच्या तिसऱ्या व चौथ्या आठवड्यात एकाच वेळी login होत असतात. त्यामुळे यंत्रणेच्या सर्व्हरवर अधिक ताण येऊन देयकातील आवश्यक माहिती भरण्यासाठी विलंब होतो. सेवार्थ प्रणाली वापरणाऱ्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या संख्येत नजिकच्या काळात लक्षणीय वाढ होण्याची शक्यता असल्याने सदर यंत्रणेवरील ताण अजुनही वाढण्याची शक्यता आहे. त्याचा विचार करुन शासनाने सदर प्रणालीचे सर्व्हर्स Managed Hosting Services च्या माध्यमातून तज्ञ सेवा पुरवठादारांकडे सुपूर्द करण्याच्या निर्णय घेतलेला आहे. सर्व्हर व बँडविड्थ यांच्या क्षमतेमध्ये लक्षणीय वाढ होऊन देयकांचे processing लवकर होऊन वरील अडचणी उद्‌भवणार नाहीत. दरम्यानच्या काळात तात्पुरती उपाययोजना म्हणून खालील प्रमाणे देयकांचे सादरीकरण केल्यास या अडचणींवर मात करता येऊ शकेल.

सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिनस्त असलेल्या तालुका पातळीपर्यंतच्या कार्यालयांना सेवार्थ प्रणाली वापरण्याच्या वेळा खालील प्रमाणे प्रस्तावित करण्यात येत आहेत. 'अ' येथे नमूद केलेले विभाग व अधिनस्त कार्यालये यांनी सकाळी १०.०० ते ०२.०० व 'ब' येथे नमूद केलेले विभाग व अधिनस्त कार्यालये यांनी दुपारी ०२.०० ते ०६.०० ह्या वेळात प्रणालीचा वापर करावा त्यामुळे प्रणालीवरील ताण कमी होईल.

| | 'अ' | | 'ब' |
|---|---|---|---|
| १ | कृषी व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विभाग व मत्स्यव्यवसाय विभाग | १ | नियोजन विभाग |
| २ | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | २ | सार्वजनिक आरोग्य विभाग |
| ३ | रोजागार व स्वयंरोजगार विभाग | ३ | सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ४ | वित्त विभाग | ४ | महसूल व वन विभाग |
| ५ | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | ५ | ग्राम विकास व जलसंधारण विभाग |
| ६ | सामान्य प्रशासन विभाग (विधानमंडळ सचिवालय,महाराष्ट्र लोकसेवा आयोगासह) | ६ | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग |
| ७ | उच्च व तंत्रशिक्षण विभाग | ७ | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग |
| ८ | गृह विभाग | ८ | आदिवासी विकास विभाग |
| ९ | गृहनिर्माण विभाग | ९ | नगर विकास विभाग |
| १० | उद्योग, उर्जा व कामगार विभाग | १० | जलसंपदा विभाग |

१२ विशेष आयुक्त, महाराष्ट्र शासन, नवी दिल्ली
१३ वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

१२ महिला व बालविकास विभाग
१३ अल्पसंख्यांक विकास विभाग
१४ सांस्कृतिक कार्य व पर्यटन विभाग

वरील प्रमाणे कार्यवाही करुन सहकार्य करावे असे आवाहन करण्यात येत आहे.

सदर परिपत्रकानुसार कार्यवाही करण्याचे निर्देश सर्व संबंधित विभाग प्रमुखांनी अधिनस्त कार्यालयांना त्यांच्या स्तरावरुन द्यावेत

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१००६०१२०३८४७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

**(स.अ.मु.नक्वी)**
**उप सचिव, वित्त विभाग,**

प्रति,

सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील अ.मु.स./ प्र.स. / सचिव ,